नंदुरबार जिल्ह्यातील शहादा तालुक्यातील ८ इतर जिल्हा मार्ग व ३ ग्रामीण मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१४५/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- १२ ऑक्टोबर, २०१८**

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.का-५/साबांप्राविना/प्रआ/रस्ते दर्जोन्नत/ता.शहादा/३७३८/२०१८ दि. २०/०७/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधिन पत्रान्वये नंदुरबार जिल्ह्यातील शहादा तालुक्यातील ८ इतर जिल्हा मार्ग व ३ ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, नंदुरबार यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या तसेच रस्त्यांचा एकुण होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, नाशिक यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, नंदुरबार यांचा ठराव विचारात घेऊन नंदुरबार जिल्ह्यातील शहादा तालुक्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रमुख जिल्हा मार्ग-१ पासून नांद्या - कुसुमवाडे - चिखली - औरंगपूर - परीवर्धे - वाघोदे - काथर्दादिगर - धुरखेडा - लांबोळे- वर्धे - टेंभे ते प्रमुख जिल्हा मार्ग-१६ ला (शेल्टी) मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ०९ | (०/०० ते ३२/८५०) ३२.८५० कि.मी. | ३२.८५० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-३५ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | राज्यमार्ग-०१ उमरी - मोहिदा - कळमसरे - छोटा धनपूर - न्यूबन - लाखपूर - करडे - तुळजा - आकसपूर - कुडावद - कुसुमवडे - फत्तेपूर - तलावडे - लक्कडकोट - अंबापुरी रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ५० | (०/०० ते ३४/४५०) ३४.४५० कि.मी. | ३४.४५० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-३६ |
| ३. | शहादा - मोहिदा - सोनवद - कहाटुळ - निंभोरा - जयनगर रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ५१ | (०/०० ते १५/५००) १५.५०० कि.मी. | १५.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-३७ |
| ४. | ससदे - शिरूड - शहादा - लोणखेडा - सावखेडा - गोगापूर - दामळदे - जावदा ते प्रमुख जिल्हामार्ग-१५ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ५२ | (०/०० ते ३५/७५०) ३५.७५० कि.मी. | ३५.७५० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-३८ |
| ५. | सुलवाडे - पिंप्री - अवघे - जुनवने - मोहिदा - होळ - उंटावद - तिखोरा - पिंगाने - कुकडेल ते राज्यमार्ग- ०४ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १३ | (०/०० ते १६/८००) १६.८०० कि.मी. | १६.८०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-३९ |
| ६. | मोहिदा - पाडळदा - परिवर्धा - कथार्दा - धुरखेडा रस्ता. | ग्रामीण मार्ग १२ | (०/०० ते ५/००) ५.०० कि.मी. | १४.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-४० |
| | | ग्रामीण मार्ग १४ | (०/०० ते २/५००) २.५०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग १६ | (०/०० ते ७/००) ७.०० कि.मी. | | |
| ७. | प्रकाशा - धुरखेडा - भादे - आलखेडा - मोहिदा (त.ह.) ते इतर जिल्हा मार्ग-१३ पर्यंत रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ३७ | (०/०० ते १७/१५०) १७.१५० कि.मी. | १७.१५० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-४१ |
| ८. | राज्यमार्ग-५ ते होळगुजरी - डोंगरगांव - मोहिदा (त.श.) -वरूळ- कानडी- बिलाडी रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १४ | (०/०० ते १६/५००) १६.५०० कि.मी. | २६.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-४२ |
| | | इतर जिल्हा मार्ग ५३ | (०/०० ते १०/००) १०.०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **१९३.५०० कि.मी.** | |

उपरोक्त रस्त्यांपैकी १) अनुक्रम-३ या रस्त्यावरील सा.क्र. ०/०० ते १/०० व सा.क्र. ३/०० ते ९/५०० या लांबीवर मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत दि. १२/०९/२०१७ रोजी काम पूर्ण करण्यात आलेले असून सदर रस्त्याच्या देखभाल व दुरूस्तीचा कालावधी काम पूर्ण झाल्याच्या दिनांका पासून पाच वर्षापर्यंत आहे. २) अनुक्रम-५ या रस्त्यावरील अवघे - जुनवने - पिंगाने या ९.०० कि.मी. लांबीवर मुख्यमंत्री ग्रामसडक योजना २०१९-२० अंतर्गत काम प्रस्तावित आहे. "सदर लांबीवर संबंधीत योजनेचा देखभाल व दुरूस्तीचा कालावधी संपल्यानंतरच सार्वजनिक बांधकाम विभागाकडून कामे करण्यात येतील." या अटीच्या अधीन राहून सदर रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहे.

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील नंदुरबार जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या लांबीत **१९३.५००** ने वाढ होवून एकूण लांबी (७८१.२३० + १९३.५००) म्हणजेच **९७४.७३० कि.मी.** इतकी व **इतर जिल्हा मार्ग** लांबीत **१७९.००कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (१३९२.८९ - १७९.००) म्हणजेच **१२१३.८९ कि.मी.** इतकी तसेच ग्रामीण मार्ग रस्त्यांची लांबीत **१४.५०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (४०७१.७२० - १४.५००) म्हणजेच ४०५७.२२० कि. मी. इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१२१५००२१४०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2018.10.12 15:02:01 +05'30'

**(प्रशांत पाटील)**

अवर सचिव,(नियोजन) महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी, नंदुरबार.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, धुळे (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, शहादा.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
९) निवडनस्ती.